**महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळ, पुनर्रचना करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय,क्रमांक: दर्शनि - २०१५ / प्र.क्र.९३ /सांका.-२.**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ सप्टेंबर २०१५.

वाचा : १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्रमांक दर्शनि-२०१३/प्र.क्र.५७/सां.का.२,दिनांक १६ जुलै २०१३.
२. कार्यकारी संपादक व सचिव(प्र.),दर्शनिका विभाग,मुंबई यांचे पत्र क्रमांक दर्श-संपा.मं.-८४७,दि.१७.०७.२०१५.

**प्रस्तावना :-**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील दि. १६ जुलै २०१३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळाची पुनर्रचना करण्यात आली होती. या संपादक मंडळाची मुदत उक्त शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षे किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत होती. प्रशासकीय कारणास्तव महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळाची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

दर्शनिका विभागांतर्गत असलेल्या महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळावर संदर्भ क्र.१ येथील दि.१६ जुलै २०१३ च्या शासन निर्णयान्वये नियुक्त केलेल्या सर्व अशासकीय सदस्य, तज्ञ सदस्य व स्विकृत सदस्य यांच्या नियुक्त्या रद्द करण्याचा निर्णय या शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे .तसेच या महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळाची पुनर्रचना करुन त्यावर खालील अध्यक्ष व सदस्यांची या आदेशाच्या दिनांकापासून ३ वर्षाच्या कालावधीसाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | सचिव/प्रधान सचिव,सांस्कृतिक कार्य, (मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे संबंधित सचिव) | पदसिध्द अध्यक्ष |
| २) | डॉ. गो.बं.देगलूरकर | अशासकीय सदस्य |
| ३) | डॉ. किशोर गायकवाड | अशासकीय सदस्य |
| ४) | श्रीमती सायली पलांडे - दातार | अशासकीय सदस्य |
| ५) | डॉ.बी.जी.कुलकर्णी | अशासकीय सदस्य |
| ६) | डॉ.अविनाश आवलगावकर | अशासकीय सदस्य |
| ७) | डॉ.श्रीराम येरणकर | अशासकीय सदस्य |
| ८) | डॉ.मंजिरी भालेराव | अशासकीय सदस्य |
| ९) | डॉ.सुनिल पूरी | अशासकीय सदस्य |
| १०) | डॉ. श्रध्दा कुंभोजकर | अशासकीय सदस्य |
| ११) | श्री गिरीष मांडके | अशासकीय सदस्य |
| १२) | डॉ.अंबरीश खरे | अशासकीय सदस्य |
| १३) | कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग | सदस्य सचिव |

२. तसेच डॉ.सुधाकर बुगदाणे यांची बुलढाणा जिल्हा गॅझेटिअर, श्री अशोकसिंग ठाकूर यांची चंद्रपूर जिल्हा गॅझेटिअर, डॉ. जी. ए. बुआ यांची सिंधुदूर्ग जिल्हा गॅझेटिअर व डॉ. हरिभाऊ क्षिरसागर यांची वाशिम जिल्हा गॅझेटिअरसाठी स्विकृत सदस्य म्हणुन नियुक्ती करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. या संपादक मंडळाच्या अशासकीय सदस्यांना अनुज्ञेय असलेला प्रवासभत्ता, दैनिकभत्ता शासन निर्णय,वित्त विभाग क्र.प्रवास-१०१०/ प्र.क्र. २/ सेवा-५, दिनांक ३.३.२०१० व बैठकभत्ता शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.बैठक-२०१२/ प्र.क्र. १/ सेवा-५, दिनांक २४.५.२०१२ अन्वये मंजूर करण्यात यावा.मात्र या अशासकीय सदस्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकूलीत प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही. प्रवासभत्ता, दैनिकभत्ता व बैठकभत्ता यामध्ये शासन वेळोवेळी जे बदल करेल ते या संपादक मंडळाच्या अशासकीय सदस्यांना लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९०५११५५५८२५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pradeep Ramchandra More

Digitally signed by Pradeep Ramchandra More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3b6c8332e4a8523acecd736ac47ff2ba698f66cc8a18822c2707d7f1bb024b5a, cn=Pradeep Ramchandra More
Date: 2015.09.05 12:09:13 +05'30'

( प्रदिप रा.मोरे )
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सांस्कृतिक कार्य ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२) सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
४) कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग,मुंबई.
५) मंडळाचे सर्व सदस्य व स्विकृत सदस्य (कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग,मुंबई यांचे मार्फत)
६) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई .
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुबई.
९) वित्त विभाग (व्यय-१४/सेवा-५) मंत्रालय,मुंबई.
१०) निवड नस्ती.-सां.का.२.